**“कायम विनाअनुदान” तत्वावर परवानगी दिलेल्या व शासन निर्णय, दिनांक १ व २ जुलै, २०१६ अन्वये अनुदानास पात्र घोषित केलेल्या तथापि, शासन निर्णय, दिनांक ९ मे, २०१८ अन्वये वगळण्यात आलेल्या शाळांपैकी पात्र माध्यमिक शाळा व तुकडयांना अनुदान मंजूर करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : प्रामाअ-२०१८/प्र.क्र.७३/एसएम-४,**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- ५ जानेवारी, २०१९.

**वाचा :-** (१) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्रमांकः-माशाअ २००९/ ५९९/०९/ माशि-१, दिनांक २० जुलै, २००९,

(२) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्रमांकः- माशाअ- २००९/ ५९९/०९/माशि-१, दिनांक १५ नोव्हेंबर, २०११,

(३) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्रमांकः-संकीर्ण- २०१२/ १५०/१२/माशि-१, दिनांक १६ जुलै, २०१३,

(४) शासन निर्णय,शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्रमांकः- माशामु-२०१६/ प्र.क्र.११/१६/एसएम-४, दिनांक १ जूलै, २०१६,

(५) शासन निर्णय,शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्रमांकः- प्राशामु-२०१६/ प्र.क्र.३८/१६/एमएम-४, दिनांक १ जूलै, २०१६,

(६) शासन निर्णय,शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्रमांकः- माशामु-२०१६/ प्र.क्र.८२/१६/एसएम-४, दिनांक २ जूलै, २०१६,

(७) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्रमांकः- माशामु- २०१६/ प्र.क्र.१८/एसएम-४, दिनांक १९ सप्टेंबर, २०१६,

(८) शासन निर्णय,शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्रमांक :-प्रामाअ-२०१८/ प्र.क्र.७३/एसएम-४, दिनांक ९ मे, २०१८.

(९) शासन निर्णय, अनुवि/४९१८/(४२/१८)/अर्थसंकल्प, दि. ५ सप्टेंबर,२०१८

(१०) आयुक्त (शिक्षण) महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र.शिआ/१८-१९/तपासणी/ आस्था क-१४४/४६३०/ दिनांक २९ ऑगस्ट, २०१८.

(११) शिक्षण संचालक यांचे पत्र क्र.अमाशा/तपासणी/१८-१९/माध्य-ब/३०४/१०५३/ दिनांक १५ नोव्हेंबर, २०१८.

(१२) आयुक्त (शिक्षण) महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र.शिआ/१८-१९/तपासणी/ आस्था क-१४४/६३३०, दिनांक १९ नोव्हेंबर, २०१८.

**प्रस्तावना :-**

"विनाअनुदान" व "कायम विनाअनुदान" तत्वावर परवानगी दिलेल्या व अनुदानास पात्र घोषित केलेल्या मान्यताप्राप्त खाजगी प्राथमिक व माध्यमिक शाळांना द्यावयाच्या अनुदान सूत्रामध्ये सुधारणा करुन सरसकट २० टक्के प्रमाणे अनुदान देण्याचा निर्णय मंत्रिमंडळाच्या दिनांक ३० ऑगस्ट, २०१६ रोजीच्या बैठकीमध्ये घेण्यात आला. त्यानुसार दिनांक १४ जून, २०१६ पूर्वी अनुदानास पात्र घोषित केलेल्या १,६२८ शाळा व २,४५२ तुकडयांवरील १९,२४७ शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांना शासन निर्णय, दिनांक १९ सप्टेंबर, २०१६ अन्वये, विहित अटी व शर्तीच्या अधीन राहून सरसकट २०% प्रमाणे अनुदान मंजूर करण्यात आले.

२. "कायम विनाअनुदान" तत्वावर परवानगी दिलेल्या व शासन निर्णय, दिनांक १ व २ जुलै, २०१६ अन्वये अनुदानास पात्र घोषित केलेल्या मान्यताप्राप्त खाजगी प्राथमिक व माध्यमिक शाळा व वर्ग तुकडयांना शासनाच्या पुढील आदेशापर्यंत २०% प्रमाणे अनुदान मंजूर करण्याचा निर्णय मंत्रिमंडळाच्या दिनांक १७ एप्रिल, २०१८ रोजीच्या बैठकीत घेण्यात आला.

३. शासन निर्णय, दिनांक १ व २ जुलै, २०१६ नुसार अनुदानास पात्र घोषित केलेल्या राज्यातील काही बोगस व बनावट शाळांना अनुदान मंजूर केल्याबाबत मा.उच्च न्यायालय, औरंगाबाद खंडपीठ येथे दाखल झालेल्या जनहित याचिका क्रमांक ०३/२०१८ मध्ये शासनाने, या शाळांची सखोल तपासणी करून या शाळांना अनुदान मंजूरीबाबत नव्याने निर्णय घेण्यात येईल असे प्रतिज्ञापत्रात स्पष्ट केले. सदर जनहित याचिकेसोबतच्या यादीतील ५१ शाळा व १९ शाळांच्या तूकडयांबाबत सखोल तपासणी करून निर्णय घ्यावयाचा असल्याने या शाळा वगळून उर्वरीत शाळा व तुकडयांना संदर्भाधीन क्र.८ येथील शासन निर्णय, दिनांक ९ मे, २०१८ अन्वये शासनाच्या पुढील आदेशापर्यत सरसकट २० टक्के अनुदान मंजूर करण्यात आले. सदर ५१ शाळांची व १९ शाळांच्या तुकडयांची तपासणी करुन तपासणी अंती सादर झालेल्या अहवालातील पात्र ठरविलेल्या शाळा व तुकडयांना अनुदान मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

संदर्भाधीन शासन निर्णय, दिनांक ९ मे, २०१८ अन्वये वगळण्यात आलेल्या ५१ शाळा व १९ शाळांच्या वर्ग तुकडयांपैकी आयुक्त (शिक्षण) यांनी संदर्भाधीन क्र.१२ येथील पत्रान्वये शासनास सादर केलेल्या पत्रासोबतच्या शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक) यांनी संदर्भाधीन क्र.११ अन्वये सादर केलेल्या अहवालातील पात्र ठरविलेल्या ३६ माध्यमिक शाळांमधील १८१ शिक्षक व १२७ शिक्षकेत्तर तसेच ११ माध्यमिक शाळांच्या तुकडयांवरील ४१ शिक्षक असे एकूण २२२ शिक्षक व १२७ शिक्षकेतर पदांना शासनाच्या पुढील आदेशापर्यंत दिनांक १ एप्रिल, २०१८ पासून खालील अटी व शर्तीच्या अधिन राहून २०% अनुदान मंजूर करण्यात येत आहे.

संदर्भाधीन शासन निर्णय, दिनांक ९ मे, २०१८ सोबतच्या यादीतील या शासन निर्णयान्वये पात्र ठरविलेल्या माध्यमिक शाळांची यादी सोबत प्रपत्र-अ मध्ये व माध्यमिक शाळांच्या तुकडयांची यादी

सोबत-प्रपत्र-ब मध्ये जोडली आहे. तसेच, शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक) यांच्या अहवालानुसार अपात्र ठरविलेल्या/वगळण्यात आलेल्या माध्यमिक शाळा/तुकडयांची यांदी त्यासंबधीच्या कारणासह सोबत प्रपत्र-मध्ये जोडली आहे.

**अटी व शर्ती :-**

**१)** शासन निर्णय, दिनांक १५ नोव्हेंबर, २०११ व दिनांक १६ जुलै, २०१३ मधील सर्व निकष व अटींची पूर्तता करणे आवश्यक आहे. ज्या शाळांनी वरील अटींची पूर्तता केलेली नसेल, तरीही त्या शाळांचा प्रस्ताव अनुदानास पात्र घोषित करण्यासाठी शासनाकडे पाठविण्यात आला असेल, असे निदर्शनास आल्यास त्याची सर्वस्वी जबाबदारी संबंधीत विभागीय शिक्षण उपसंचालक व शिक्षणाधिका-यांवर राहील.

**२)** सदर प्राथमिक व माध्यमिक शाळांना शासनाकडून ज्या वर्षी प्रत्यक्ष अनुदान मंजूर करण्यात येईल, त्या वर्षीच्या **संचमान्यतेनुसार** मंजूर असलेली शिक्षक व शिक्षकेतर पदे अनुदानास पात्र राहतील.

**३)** ज्या शाळांमधील विद्यार्थी, शिक्षक व शिक्षकेत्तर कर्मचारी यांची उपस्थिती "**बायोमेट्रिक**" प्रणाली द्वारे नोंदविण्यात येत आहे, अशाच शाळा अनुदानास पात्र राहतील.

**४)** ज्या शाळांमध्ये शेवटच्या वर्गातील विद्यार्थी पटसंख्या ३० पेक्षा कमी असेल तसेच डोंगराळ व दुर्गम भागातील शाळांमध्ये शेवटच्या वर्गातील विद्यार्थी पटसंख्या २० पेक्षा कमी असेल अशा शाळा अनुदानास पात्र राहणार नाहीत. या शाळा अनुदान पात्रतेच्या निकषांमध्ये बसत नसल्यामुळे अशा शाळा **"स्वयं-अर्थसहाय्यित"** शाळा समजण्यात येतील.

**५)** शासन निर्णय, दिनांक १५ नोव्हेंबर, २०११ मधील निकषांप्रमाणे शाळा जरी अनुदानास पात्र ठरत असली तरी शिक्षक व शिक्षकेत्तर कर्मचा-यांच्या पद भरती संदर्भात **"आरक्षण धोरणाचे"** पालन केलेले नसेल अशा शाळांना अनुदान अनुज्ञेय राहणार नाही व अशा शाळा हया **"स्वयं-अर्थसहाय्यित"** शाळा समजण्यात येतील.

**६)** शाळेमधील सर्व शिक्षकांच्या आधारकार्डसह वैयक्तिक मान्यतेचे आदेश **"सरल"** प्रणालीत भरल्याशिवाय शाळा अनुदानास पात्र राहणार नाही.

**७)** सर्व शिक्षक व शिक्षकेत्तर कर्मचा-यांना **"राष्ट्रीय निवृत्तीवेतन योजनेत"** समाविष्ट होणे बंधनकारक राहील. अन्यथा शाळा अनुदानास पात्र राहणार नाही.

**८)** सदरहू शाळांमधील सध्या रिक्त असलेल्या व भविष्यात रिक्त होणाऱ्या पदांवरील शिक्षक भरती सेवाप्रवेश विषयक प्रचलित नियमानुसार करणे बंधनकारक राहील.

**९)** सर्व शाळांचे जिल्हा शैक्षणिक प्रणालीवरील **( यु-डायस )** क्रमांक आणि संबंधित शाळेत शिकत असलेल्या सर्व विद्यार्थ्यांचे **"आधारकार्ड"** असणे आवश्यक आहे. आधार क्रमांकाच्या आधारे विद्यार्थी संख्या ग्राहय धरण्यात येईल.

२. **शैक्षणिक गुणवत्ता** :- प्राथमिक व उच्च प्राथमिक शाळेच्या संदर्भात सर्व वर्ग प्रगत असावेत. तसेच, माध्यमिक शाळेच्या संदर्भात इयत्ता ९ वी व १० वी च्या वर्गांचा निकाल १०० टक्के असावा. शाळेतील कोणत्याही वर्गासाठी वरील निकष प्राप्त करण्यात कोणतीही शाळा सलग तीन वर्षे अपयशी ठरल्यास शाळेची मान्यता काढून शाळा बंद करण्यात यावी व शाळेतील विद्यार्थ्यांना नजीकच्या शाळेमध्ये समायोजित करण्यात यावे.

३. **क्षेत्रिय कार्यालयाची जबाबदारी** :-

**३.१** सदर शासन निर्णयासोबतच्या यादीतील प्राथमिक व माध्यमिक शाळा व तुकडयांबाबत परिच्छेद २ मधील अटी व शर्तींची पूर्तता होत असल्याबाबत तसेच परीच्छेद ३ मधील सर्व कागदपत्रांआधारे पडताळणी झाल्याबाबत शिक्षण संचालक (प्राथमिक) व शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक) यांनी प्रमाणित करुन त्याप्रमाणे सर्व संबंधित शिक्षणाधिकारी प्राथमिक व माध्यमिक) यांना कळविणे आवश्यक राहील.

**३.२** प्रत्यक्ष अनुदान वितरीत करण्यापूर्वी **"सरल"** प्रणालीनुसार सर्व माहितीची सत्यता पडताळणीची संयुक्तिक जबाबदारी संबंधित शिक्षणाधिकारी (प्राथमिक/माध्यमिक) व विभागीय शिक्षण उपसंचालक यांची राहील.

**३.३** या शाळांमध्ये संचमान्यतेनुसार शिक्षक व शिक्षकेतर पदे रिक्त असल्यास, शासकीय व खाजगी अनुदानित प्राथमिक व माध्यमिक शाळांमध्ये अतिरिक्त ठरलेल्या शिक्षक व शिक्षकेतर कर्मचा-यांना समायोजनाने सामावून घेण्यासंदर्भातील शासनाच्या प्रचलित धोरणानुसार समायोजनाने पदे भरणे बंधनकारक राहील.

४. **शासनाचा स्वेच्छाधिकार** :- शाळा अनुदानासाठी पात्र म्हणून घोषित झाली म्हणजे त्या शाळेस अनुदानाचा हक्क प्राप्त होत नाही. अनुदानास पात्र घोषित केलेल्या शाळांना अनुदान मंजूर करणे हा शासनाचा **"स्वेच्छाधिकार"** असून निधीच्या उपलब्धतेनुसार शासन निकषपात्र शाळांना अनुदान मंजूर करण्याचा निर्णय घेईल. सदर अनुदान हे भूतलक्षी प्रभावाने लागू केले जाणार नाही. तसेच, शाळांना विनाअनुदान तत्वावर कोणत्याही शैक्षणिक वर्षात मान्यता दिलेली असली तरी, राज्याची आर्थिक स्थिती, वेळोवेळी उपलब्ध होणारी आर्थिक संसाधने, राज्याच्या गरजा व त्यांचा प्राधान्यक्रम विचारात घेऊन, शासन अनुदानाच्या सूत्रात बदल करील व ज्या शाळांना अनुदान मंजूर करण्यात आलेले नाही, त्या शाळांना जेव्हा अनुदान मंजूर करावयाचे असेल त्यावेळचे अनुदान सूत्र त्यांना लागू राहील.

५. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक-४५१/व्यय-५, दिनांक ०९ मे, २०१८ नुसार दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०१९०१०५१६५४१८३२२१ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

Swati Madhukar Nanal

Digitally signed by Swati Madhukar Nanal
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education And Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=82e1d6f07c5cabf5884958ee70015d36b35b2c07e9700fe62cba2439a81b4be4, serialNumber=007d84f8ce44beba86b0ca2d0155d67cc1a9db4f8d59bc9d8067628d62bcdc1a, cn=Swati Madhukar Nanal
Date: 2019.01.05 17:05:06 +05'30'

**( स्वाती नानल )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१) मा.विरोधी पक्ष नेता, विधानसभा/विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,

२) सर्व सन्माननीय विधानसभा/विधानपरिषद सदस्य,

३) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
४) मा.मंत्री (वित्त व नियोजन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
५) मा.मंत्री (शालेय शिक्षण) यांचे विशेष कार्य अधिकारी,
६) मा.प्रधान सचिव (शालेय शिक्षण) यांचे स्वीय सहायक,
७) आयुक्त (शिक्षण) महाराष्ट्र राज्य, पुणे,
८) शिक्षण संचालक (प्राथमिक/माध्यमिक व उच्च माध्यमिक) म. रा. पुणे,
९) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर,
१०) महालेखापाल (लेखापरिक्षा) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर,
११) महालेखापाल (स्थानिक निकाय लेखा परिक्षा व लेखा) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर,
१२) स्थानिक निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई,
१३) सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक,
१४) शिक्षणाधिकारी (प्राथमिक/माध्यमिक) सर्व जिल्हा परिषद,
१५) अधिक्षक, वेतन पथक (प्राथमिक/माध्यमिक), सर्व जिल्हा परिषद,
१६) निवडनस्ती - एसएम-४.

## “प्रपत्र-अ”

**शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्रमांक : प्रामाअ-२०१८ /प्र.क्र.७३/एसएम-४, दिनांक : ५ जानेवारी, २०१९ चे सहपत्र.**

**(शासन निर्णय क्र.माशामु-२०१६/(११/१६)/२०१६/एसएम-४, दिनांक १ जुलै, २०१६ मधील वगळलेल्या शाळा)**

| अ.क्र. | संस्थेचे व शाळेचे नांव | माध्यम | इयत्ता / वर्ग | शाळेचे क्षेत्र बिगर आदिवासी/टीएसपी/ओटिएसपी /१०३ विकास गट | अनुदानास पात्र ठरणारी पदे | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | | मुख्याध्यापक | प्रशि. पदवीधर शिक्षक | लिपिक | शिपाई | **एकूण पदे** |
| | | | | **औरंगाबाद विभाग** | | | | | |
| १ | अमर ज्योती शिक्षण प्रसारक मंडळ संचलित हर्सूल उर्दू हायस्कूल, हर्सूल औरंगाबाद | मराठी | इ.८ ते १० वी | बिगर आदिवासी | १ | ४ | १ | २ | ८ |
| २ | स्वामी परमानंदगिरीजी महाराज मंदीर गुरुकुल माध्यमिक विद्यालय, पालाफाटा ता.फुलंब्री जि.औरंगाबाद | मराठी | इ.८ ते १० वी | बिगर आदिवासी | १ | ४ | १ | २ | ८ |
| ३ | कुलस्वामिनी तुळजाभवानी शिक्षण क्रीडा व सांस्कृ.मंडळ संचलित सहकार महर्षी स्व.भास्कररावजी शिंगणे माध्यमिक विद्यालय, पापळ, ता.जाफ्राबाद जि.जालना. | मराठी | इ.८ ते १० वी | बिगर आदिवासी | १ | ४ | १ | ४ | १० |
| ४ | मोहम्मदिया उर्दू हायस्कूल, कसाबखेडा ता.कन्नड जि.औरंगाबाद | उर्दू | इ.८ ते १० वी | बिगर अदिवासी | १ | ४ | १ | २ | ८ |
| | | | | **अमरावती विभाग** | | | | | |
| ५ | राजर्षि शाहू महाराज माध्यमिक विद्यालय, गुजरी (न) रा.राळेगांव जि.यवतमाळ | मराठी | इ.८ ते १० वी | बिगर आदिवासी | १ | ४ | १ | २ | ८ |
| ६ | शहीद उस्पाकउल्ला बहु.शिक्षण संस्था संच. शहीद उस्पाकउल्ला खान उर्दू हायस्कूल, काळजेश्वर ता.जि.वाशिम. | उर्दू | इ.८ ते १० वी | बिगर आदिवासी | १ | ४ | १ | २ | ८ |
| ७ | जगदंबा शिक्षण संस्था, मोहतखेड संचलित गुरुकृपा माध्य. विद्या. सावरखेड बु.ता.चिखली जि.बुलडाणा . | मराठी | इ.८ ते १० वी | बिगर आदिवासी | १ | ४ | १ | ३ | ९ |

| | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| **पुणे विभाग** | | | | | | | | | |
| ८ | रत्नप्रभा मोहिते पाटील माध्यमिक प्रशाला सावरकर नगर, पंढरपूर जि.सोलापूर | मराठी | इ.८ ते १० वी | बिगर आदिवासी | १ | ४ | १ | ४ | १० |
| ९ | चिंतामणी माध्यमिक विदयामंदिर, आंबेगांव (बु) जि.पुणे | मराठी | इ.८ ते १० वी | बिगर आदिवासी | १ | ५ | १ | २ | ९ |
| १० | नवनगर शिक्षण मंडळ संचलित स्वामी विवेकानंद माध्यमिक विद्यालय, यमुनानगर, जि.पुणे | मराठी | इ.८ ते १० वी | बिगर आदिवासी | १ | ४ | १ | ४ | १० |
| ११ | नवनगर शिक्षण मंडळ संचलित संत तुकाराम महाराज माध्यमिक विद्यालय, म्हेत्रे वस्ती, चिखली जि.पुणे | मराठी | इ.८ ते १० वी | बिगर आदिवासी | १ | ४ | १ | ४ | १० |
| १२ | शाह छप्परबंद (वि.जा.)एज्युकेशन ॲड वेलफेअर सोसायटी संचलित शाह छप्परबंद उूर्द हायस्कूल,श्रीरामपूर जि.अहमदनगर | उर्दू | इ.८ ते १० वी | बिगर आदिवासी | १ | ४ | १ | २ | ८ |
| १३ | अवंती शिक्षण व बहु.समाजसेवी संस्था संचलित लोकमंगल माध्यमिक प्रशाला, बाळे ता.उत्तर सोलापूर जि.सोलापूर | मराठी | इ.८ ते १० वी | बिगर आदिवासी | १ | ४ | १ | ४ | १० |
| १४ | अवंती शिक्षण व बहु.समाजसेवी संस्था संचलित लोकमंगल माध्यमिक प्रशाला, पडसाळी, ता.उत्तर सोलापूर जि.सोलापूर | मराठी | इ.८ ते १० वी | बिगर आदिवासी | १ | ४ | १ | ४ | १० |
| १५ | अवंती शिक्षण व बहु.समाजसेवी संस्था संचलित लोकमंगल माध्यमिक प्रशाला, अवंतीनगर, ता.जि.सोलापूर | मराठी | इ.८ ते १० वी | बिगर आदिवासी | १ | ४ | १ | ४ | १० |
| **नाशिक विभाग** | | | | | | | | | |
| १६ | डॉ.बाबासाहेब आंबेडकर आदिवासी सर्वांगिन विकास मंडळ संचलित, माध्यमिक विद्यालय, मोख, ता.अक्राणी जि.नंदुरबार | मराठी | इ.८ ते १० वी | टीएसपी | १ | ४ | १ | २ | ८ |

| | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १७ | भाग्यश्री जरसंदा शैक्षणिक व बहु.शिक्षण संस्था शारदा माध्यमिक विद्यालय, उंबरपाडा खुर्द ता.पेठ जि.नाशिक | मराठी | इ.८ ते १० वी | आदिवासी | १ | ४ | १ | २ | ८ |
| १८ | शिवाजी विद्या प्रसारक संस्था संचलित माध्यमिक विद्यालय, रनाळे ता.जि.नंदुरबार | मराठी | इ.८ ते १० वी | बिगर आदिवासी | १ | ४ | १ | २ | ८ |
| १९ | महात्मा फुले युवक विकास मंडळ संचलित सौ.मंगलाताई रमेश सोनावणे माध्यमिक विद्यालय, दिगर ता.शहादा जि.नंदुरबार | मराठी | इ.८ ते १० वी | आदिवासी | १ | ४ | १ | २ | ८ |
| **नागपूर विभाग** | | | | | | | | | |
| २० | प्रोग्रेसिव्ह मागासवर्गीय शिक्षण संस्था संच.अर्चना फुले हायस्कुल, ५०८ विनोबा भावे बसवेश्वर सोसायटी, नागपूर | मराठी | इ.८ ते १० वी | बिगर आदिवासी | १ | ४ | १ | २ | ८ |
| २१ | सौ.पार्वतीबाई शिक्षण संस्था संचलित नरसिंग माध्यमिक विद्यालय, तिल्ली/मोहगांव,गोरेगांव | मराठी | इ.८ ते १० वी | बिगर आदिवासी | १ | ४ | १ | २ | ८ |
| २२ | प्रेम सेवा शिक्षण संघ द्वारा संचलित रॉजर स्ट्रॉन्सस्टॅड (मराठी) हायस्कूल, गोरेवाडी वस्ती, नागपूर | मराठी | इ.८ ते १० वी | बिगर आदिवासी | १ | ४ | १ | २ | ८ |
| **मुंबई विभाग** | | | | | | | | | |
| २३ | मॉ जीवदानी एज्युकेशन ट्रस्टचे नरवडे हायस्कूल, तुंगारेश्वर नगर, गोखिवरे संतोष भवन, नालासोपारा (पूर्व) ता.वसई जि.ठाणे. | मराठी | इ.८ ते १० वी | बिगर आदिवासी | १ | ४ | १ | २ | ८ |
| २४ | महमंद अली फरीद एज्यु. ॲड वेलफेअर सोसायटी संचलित रफीका उर्दू हाय. आझादनगर मुंब्रा ठाणे | उर्दू | इ.८ ते १० वी | बिगर आदिवासी | १ | ४ | १ | २ | ८ |
| २५ | द.महाराष्ट्र एज्युकेशन ॲड वेलफेअर ट्रस्ट संचलित केबन हायस्कूल, धारावी, मुं. | मराठी | इ.८ ते १० वी | बिगर आदिवासी | १ | ४ | १ | २ | ८ |
| २६ | रजनीगंधा माध्यमिक विद्यालय, आजदेपाडा, एमआयडीसी डोंबिवली (पूर्व) जि.ठाणे | मराठी | इ.८ ते १० वी | बिगर आदिवासी | १ | ४ | १ | २ | ८ |

| | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| २७ | सकीना एज्यु. ट्रस्ट संच. महाराष्ट्र शिक्षा निकेतन हायस्कूल, अशोकनगर, वाशी नाका, आर. सी. मार्ग, चेंबूर मुंबई. | मराठी व हिंदी | इ.८ ते १० वी | बिगर आदिवासी | १ | ४ | १ | ४ | १० |
| २८ | श्रीमती एम.एच.यादव एज्यु. सो. संचलित साईप्रसाद हिंदी हाय. शिवशक्तीनगर, कळवा (पूर्व) जि.ठाणे. | हिंदी | इ.८ ते १० वी | बिगर आदिवासी | १ | ४ | १ | २ | ८ |
| २९ | डॉ.शारंगधर चॅरिटेबल ट्रस्ट संच. शशांक माध्य. विद्यालय, वाडेघर चौक, आधारवाडी कल्याण. | मराठी | इ.८ ते १० वी | बिगर आदिवासी | १ | ४ | १ | २ | ८ |

## “प्रपत्र-ब”

**शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्रमांक : प्रामाअ-२०१८ /प्र.क्र.७३/एसएम-४, दिनांक : ५ जानेवारी, २०१९ चे सहपत्र.**

**(शासन निर्णय क्र.माशामु-२०१६/(११/१६)/२०१६/एसएम-४, दिनांक १ जुलै, २०१६ मधील वगळलेल्या तुकडया)**

| अ. क्र. | संस्थेचे व शाळेचे नांव | माध्यम | इयत्ता / वर्ग | शाळेचे क्षेत्र बिगर आदिवासी/टीएसपी/ओटिएसपी/१०३ विकास गट | अनुदानास पात्र ठरणारी पदे | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | | डी.एड | प्रशिक्षित पदवीधर शिक्षक | **एकूण पदे** |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| | **औरंगाबाद विभाग** | | | | | | |
| १ | ईश्वर शिक्षण प्रसारक मंडळ संचलित, जीवन शिक्षण माध्यमिक विद्यालय, गांजपूर, ता.धारुर जि.बीड | मराठी | इयत्ता ५ वी ते ७वी (प्रथम वर्ग) | बिगर आदिवासी | ३ | १ | ४ |
| २ | ईश्वर शिक्षण प्रसारक मंडळ संचलित, जीवन शिक्षण माध्यमिक विद्यालय, आसोला, ता.धारुर जि.बीड | मराठी | इयत्ता ५ वी ते ७वी (प्रथम वर्ग) | बिगर आदिवासी | ३ | १ | ४ |
| ३ | पाथरी तालुका शिक्षण प्रसारक मंडळ मानवत संचलित माध्यमिक व उच्च माध्यमिक विद्यालय, देवनांद्रे जि.परभणी. | मराठी | इयत्ता ८ वी (चौथी तुकडी) | बिगर आदिवासी | | २ | २ |
| ४ | नरहर कुरुंदकर शिक्षण संस्था, कुरुंदा संचलित रोकडेश्वर विद्यालय, पांगरा (शिंदे) ता.वसमत जि.हिंगोली | मराठी | इयत्ता ५ वी ते ७वी (प्रथम वर्ग) | बिगर आदिवासी | ३ | १ | ४ |
| ५ | बाल शिक्षण प्रसारक मंडळ गिरगांव संचलित कै.पुंजाजी पाटील माध्यमिक विद्यालय, सुकळी ता.कळमनुरी जि.हिंगोली | मराठी | इयत्ता ५ वी ते ७वी (प्रथम वर्ग) | बिगर आदिवासी | ३ | १ | ४ |
| ६ | राजर्षि छत्रपती शाहू महाराज माध्यमिक विद्यालय, डुकरी पिंपरी, ता.जि.जालना | मराठी | इयत्ता ८ वी व ९ वी (दुसरा वर्ग) | बिगर आदिवासी | -- | ३ | ३ |

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| **नाशिक विभाग** | | | | | | | |
| ७ | जीवन साधना विद्या प्रसारक मंडळ संचलित, माध्यमिक विद्यालय, बिलाडी त.सा.शहादा जि.नंदुरबार. | मराठी | इयत्ता ५ वी ते ७वी (प्रथम वर्ग) | आदिवासी | ३ | १ | ४ |
| **नागपूर विभाग** | | | | | | | |
| ८ | भारतीय बुध्दधम्म ज्ञान विद्यालय संचलित विशाखा माध्यमिक विद्यालय (हिंदी) बिनाके लेआऊट, नागपूर | हिंदी | इयत्ता ५ वी ते ७वी (प्रथम वर्ग) | आदिवासी | ३ | १ | ४ |

***********

## "प्रपत्र-अ"

### शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्रमांक : प्रामाअ-२०१८ /प्र.क्र.७३/एसएम-४, दिनांक : ५ जानेवारी, २०१९ चे सहपत्र.
### (शासन निर्णय क्र.माशामु-२०१६/(८२/१६)/२०१६/एसएम-४, दिनांक २ जुलै, २०१६ मधील वगळलेल्या शाळा)

| अ.क्र. | संस्थेचे व शाळेचे नांव | माध्यम | इयत्ता / वर्ग | शाळेचे क्षेत्र बिगर आदिवासी/टीएसपी/ओटिएसपी/१०३ विकास गट | अनुदानास पात्र ठरणारी पदे | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | | मुख्या-ध्यापक | प्रशि. पदवीधर शिक्षक | लिपिक | शिपाई | **एकूण पदे** |
| | | | | **नाशिक विभाग** | | | | | |
| १ | रॉयल उर्दू हायस्कूल, फत्तेपूर,ता.जामनेर जि.जळगांव | उर्दू | इ.८ ते १० वी | बिगर अदिवासी | १ | ४ | १ | २ | ८ |
| २ | के.पी.सोनार माध्यमिक विद्यालय, वरणगांव ता.भुसावळ जि.जळगांव | मराठी | इ.८ ते १० वी | बिगर अदिवासी | १ | ४ | १ | २ | ८ |
| ३ | जय हनुमान क्रीडा व सांस्कृतिक मंडळ टोळी संचलित माध्यमिक विद्यालय, धुळपिंप्री, ता.पारोळा जि.जळगांव | मराठी | इ.८ ते १० वी | बिगर अदिवासी | १ | ४ | १ | २ | ८ |
| ४ | आई बिजासनी देवी माध्यमिक विद्यालय दुर्बल्या,ता.शिरपूर जि.धुळे. | मराठी | इ.८ ते १० वी | बिगर अदिवासी | १ | ४ | १ | २ | ८ |
| ५ | इकरा उर्दू हायस्कूल, शहादा जि.नंदुरबार | उर्दू | इ.८ ते १० वी | बिगर आदिवासी | १ | ४ | १ | २ | ८ |
| | | | | **औरंगाबाद विभाग** | | | | | |
| ६ | मॉडर्न शिक्षण प्रसारक मंडळ गेवराई संचलित स्व.किसनाबाई बन्सीलालजी संचेती माध्यमिक विद्यालय, वैजापूर जि.औरंगाबाद | मराठी | इ.८ ते १० वी | १०३ विकास गट | १ | ४ | १ | २ | ८ |
| ७ | बळीराजा शिक्षण संस्था सोमेश्वर पालम संचलित संत ज्ञानेश्वर विद्यालय, ताडपांगरी, जि.परभणी | मराठी | इ.८ ते १० वी | बिगर आदिवासी | १ | ४ | १ | ४ | १० |

***********

# प्रपत्र-ब”

**शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्रमांक : प्रामाअ-२०१८ /प्र.क्र.७३/एसएम-४, दिनांक : ५ जानेवारी,२०१९ चे सहपत्र.**

**(शासन निर्णय क्र.माशामु-२०१६/(८२/१६)/२०१६/एसएम-४, दिनांक २ जुलै, २०१६ मधील वगळलेल्या तुकडया)**

| अ. क्र. | संस्थेचे व शाळेचे नांव | माध्यम | इयत्ता / वर्ग | शाळेचे क्षेत्र बिगर आदिवासी/टीएसपी/ओटिएसपी/१०३ विकास गट | अनुदानास पात्र ठरणारी पदे | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | | | डी.एड | प्रशिक्षित पदवीधर शिक्षक | **एकूण पदे** |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| | | | **नाशिक विभाग** | | | | |
| १ | जमीया इस्लामिया इशातुल उलुम संचलित मौलाना अब्दुल कलाम आझाद उर्दू हायस्कूल, अक्कलकुवा नंदुरबार. | मराठी | इयत्ता ५ वी ते ७वी (प्रथम वर्ग) | बिगर आदिवासी | ३ | १ | ४ |
| | | | **औरंगाबाद विभाग** | | | | |
| २ | शरद शिक्षण संशोधन संस्था जालना संचलित प्रतिभा माध्यमिक विद्यालय काजळा, ता.बदनापूर जि.जालना. | मराठी | इयत्ता ५ वी ते ७वी (प्रथम वर्ग) | बिगर आदिवासी | ३ | १ | ४ |
| | | | **नागपूर विभाग** | | | | |
| ३ | दत्तात्रय शिक्षण संस्था नागपूर संचलित मातोश्री लक्ष्मीबाई कामनापूरे विद्यालय, निलडोह, ता.हिंगणा जि.नागपूर | मराठी | इयत्ता ५ वी ते ७वी (प्रथम वर्ग) | बिगर आदिवासी | ३ | १ | ४ |

***********

**" प्रपत्र-क "**

शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्रमांक : प्रामाअ-२०१८ /प्र.क्र.७३/एसएम-४,
दिनांक : ५ जानेवारी, २०१९ चे सहपत्र.
(शासन निर्णय क्र.माशामु-२०१६/(८२/१६)/२०१६/एसएम-४, दिनांक २ जुलै, २०१६ मधील वगळलेल्या तुकडया)

| अ. क्र. | संस्थेचे व शाळेचे नांव | माध्यम | इयत्ता / वर्ग | अनुदानास अपात्र ठरलेल्या व शासन निर्णयातून वगळलेल्या शाळा |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | तुळजाभवानी महिला मंडळ संचलित रत्नप्रभादेवी मोहिते पाटील विद्यालय, पंढरपूर जि.सोलापूर. | मराठी | इयत्ता ८ वी ते १० वी (प्रथम वर्ग) | शासन निर्णयात दुबार आलेली असल्याने वगळली आहे. |
| २ | जय योगेश्वर सांस्कृतिक मंडळ संचलित माध्यमिक विद्यालय, डांबली-धांदरणे ता.सिंदखेडा जि.धुळे. | मराठी | इयत्ता ८ वी ते १० वी (प्रथम वर्ग) | शाळेची स्थलांतराबाबत तक्रार असल्याने सदर शाळेसंदर्भात चौकशी सुरु आहे त्याकारणास्तव वगळण्यात आली आहे. |
| ३ | आगरी शिक्षण संस्थेची माध्यमिक विद्यालय ,खांदेश्वर कॉलनी सेक्टर-६ नवीन पनवेल (प) ता.पनवेल जि.रायगड. | मराठी | इयत्ता ८ वी ते १० वी (प्रथम वर्ग) | सदर शाळा शासन निर्णय, दिनांक ३० जून, २०१४ अन्वये अनुदानास पात्र घोषित करण्यात आली आहे. शाळेस २० टक्के अनुदान सुरु आहे. यादीत दुबार |
| ४ | स्वामी विवेकानंद शिक्षण प्रसारक मंडळ अक्कलकुवा संचलित माध्यमिक विद्यालय, तळोदा जि.नंदुरबार. | मराठी | इयत्ता ८ वी ते १० वी (प्रथम वर्ग) | सदर शाळा बंद आहे. अपात्र |
| ५ | पद्मावती शिक्षण प्रसारक मंडळ सोलापूर संचलित सिध्दार्थ मराठी विद्यालय , अमरज्योती नगर, मुळेगांव रोड, सोलापूर. | मराठी | इयत्ता ५ वी ते इयत्ता ७ वी | सदर शाळा प्राथमिक असून माध्यमिक शाळांच्या यादीतून वगळून सदर प्राथमिक शाळेचा प्राथमिक शाळांच्या यादीत समावेश केला आहे (शासन शुध्दीपत्रक दिनांक ६ डिसेंबर, २०१८ अन्वये आदेश निर्गमित केले आहे.) |

********